**मराठवाडा पाणलोट विकास मिशन**
टप्पा-२ मधील पाणलोटांना मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
**शासन निर्णय क्र.मपामि २००८/प्र.क्र.१५२/जल-७,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक :- ७ जानेवारी, २०१०.**

**वाचा :- शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग**
**१) क्र.एसएलएफ १८/०५/प्र.क्र.४८०/जल-१२, दि.२४ ऑक्टोबर, २००५.**
**२) क्र.एसएलएफ १८/०५/प्र.क्र.४८०/जल-१२, दि.११ मे, २००६.**
**३) क्र.एसएलएफ १८/०५/प्र.क्र.४८० (भाग-२ ब)/जल-१२, दि.१३ सप्टेंबर, २००६.**
**४) क्र.आजनि २००८/प्र.क्र.७/जल-७, दि.१३ फेब्रुवारी, २००८.**
**५) क्र.मपामि २००८/प्र.क्र.१५२/जल-७, दि.२१ ऑक्टोबर, २००८.**
**६) क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र.४९/जल-७, दि.२९ ऑक्टोबर, २००९.**
**७) क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र.४९/जल-७, दि.१२ नोव्हेंबर, २००९ व दि. १४ डिसेंबर, २००९.**
**८) क्र.नाबार्ड २००९/प्र.क्र.४९/जल-७, दि.२० नोव्हेंबर, २००९.**

**प्रस्तावना :-**

मराठवाडा विभागातील जास्त कोरडवाहू क्षेत्र, कमी नैसर्गिक वनस्पती, पाणी टंचाई इ. भौगोलिक परिस्थिती विचारात घेवून या क्षेत्रात भूगर्भातील पाण्याची पातळी वाढविण्याच्या दृष्टीने मराठवाडा पाणलोट विकास मिशनची अंमलबजावणी करण्यासाठी संदर्भाधीन शासन निर्णय दि.२४ ऑक्टोबर, २००५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. हा कार्यक्रम राबविण्याबाबतच्या मार्गदर्शक सूचना संदर्भाधीन दि.११ मे, २००६ व दि.१३ सप्टेंबर, २००६ अन्वये देण्यात आलेल्या आहेत.

मराठवाडा विभागातील औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद व लातूर या ८ जिल्हयांत पाणलोट विकास मिशन स्वतंत्रपणे राबविल्यामुळे अंमलबजावणीचे सदृष्य परिणाम लक्षात घेवून मराठवाडा पाणलोट विकास मिशनचा टप्पा-२ कार्यान्वित करण्यास संदर्भाधीन दि.२१ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार मराठवाडयातील प्रत्येक जिल्हयात एक मेगा पाणलोट विकसित करण्यात येणार आहे.

--२.

मराठवाडा विभागातील औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद व लातूर या ८ जिल्हयांत **GSDA** व **MRSAC** यांनी घोषित केलेल्या पाणलोटांपैकी प्राथमिकतेनुसार प्रत्येकी २ मेगा पाणलोट विकसित करण्यास संदर्भाधीन दि.१२ नोव्हेंबर, २००९ व दि.१४ डिसेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आता मराठवाडा विभागातील औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद व लातूर या ८ जिल्हयांत मराठवाडा पाणलोट विकास मिशन टप्पा-२ अंतर्गत कार्यान्वित करावयाचे मेगा पाणलोट मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मराठवाडा विभागातील औरंगाबाद, जालना, परभणी, हिंगोली, बीड, नांदेड, उस्मानाबाद व लातूर या ८ जिल्हयांतून खालील तक्त्यात नमूद प्रति जिल्हा १ मेगा पाणलोट असे एकूण ८ मेगा पाणलोट मराठवाडा पाणलोट विकास मिशन टप्पा-२ अंतर्गत कार्यान्वित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| DIVISION | DISTRICT | Sr.No. | TALUKA | W/S No. | AREA (Ha.) | Type of Priority |
|---|---|---|---|---|---|---|
| 1 | 2 | 3 | 4 | 5 | 6 | 7 |
| AURANGABAD | AURANGABAD | 1 | Aurangabad / Phulambri | GP-8 | 33359 | High + DPAP |
| | BEED | 2 | Patoda / Shirur | GV-59 | 18544 | High + DPAP |
| | JALNA | 3 | Jafrabad/Jalna | GP-32A | 11194 | Moderate + DPAP |
| LATUR | OSMANABAD | 4 | Tuljapur | BM-1 | 34209 | Only High |
| | LATUR | 5 | Ahmadpur | GV-97B | 2175 | High + DPAP+ O.E. |
| | PARBHANI | 6 | Gangakhed | GV-97A | 34261 | Low Priority+ DPAP |
| | HINGOLI | 7 | Shengaon | GP-47 | 31080 | High + DPAP |
| | NANDED | 8 | Kinwat | NPG-14 | 30799 | High + DPAP |

२. उपरोक्त मान्यता देण्यात आलेले मेगा पाणलोट हे **RIDF-15** अंतर्गत नाबार्डकडून मिळणा-या अर्थसहाय्यातून विकसित करण्यास संदर्भाधीन दि.१२ नोव्हेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

३. प्रत्येक मेगा पाणलोटाचे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) नाबार्डच्या मार्गदर्शक सूचनांनुसार आणि निकषांनुसार आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत किंवा नाबार्डने सुचविलेल्या अन्य संस्थांमार्फत तयार करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. तसेच प्रशिक्षण, भेटी (Exposure Visit) इ. वरील खर्च नाबार्डच्या निकषांनुसार व त्यांच्या अटी व शर्तीप्रमाणे करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. उपरोक्त नमूद पाणलोटात असलेल्या सर्व वनक्षेत्राचा समावेश प्रकल्प अहवालात न चुकता करण्यात यावा. वनक्षेत्रात अपेक्षित असलेली कामे वन विभागामार्फत किंवा सदर विभागाच्या मान्यतेने अन्य क्षेत्रिय यंत्रणेकडून करुन घ्यावीत.

५. उपरोक्त परिच्छेद क्र.१ मध्ये नमूद पाणलोटांचे सविस्तर प्रकल्प अहवाल (DPR) तयार करण्यासाठी लागणारा खर्च हा संदर्भाधीन दि.२० नोव्हेंबर, २००९ च्या शासन निर्णयान्वये मंजूर व वितरीत करण्यात आलेल्या निधीतून भागविण्यात यावा.

६. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक **२०१००१०७१६३२१२००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( ना.श्री.कराड )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
मा.राज्यपाल यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
मा.राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव,
सर्व मा.मंत्री, मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषद,
मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,
सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय,
सर्व विभागीय आयुक्त,

आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे,
संचालक,मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, पुणे,
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर), पुणे,
प्रधान मुख्य वन सरंक्षक, नागपूर,
संचालक, सामाजिक वनीकरण, पुणे,
संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दी करीता),
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,
सर्व अधीक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर) मंडळ,
सर्व सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,
सर्व उपसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्ते,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १ व २, मुंबई व नागपूर,
महाराष्ट्र राज्य जलसंधारण सल्लागार परिषदेचे सर्व अशासकीय सदस्य,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी (जलसंधारण खुद्द) मंत्रालय,
निवडनस्ती जल-७.